राष्ट्रीय आरोग्य अभियान/ राष्ट्रीय क्षयरोग दुरीकरण कार्यक्रम मंजूर प्रकल्प अंमलबजावणी आराखडा (PIP) सन २०२१-२२ मधील FMR Code १.१.१८.१ अर्थशिर्षांतर्गत तरतुदीमधून Truenat Machine हे एकलस्त्रोताद्वारे खरेदीस प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-१२२२/प्र.क्र.०७ /आरोग्य-७**
१० वा मजला, गो. ते. रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४०००01.
दिनांक : २२ फेब्रुवारी, २०२२.

**वाचा :-**

१) सहसंचालक, आरोग्य सेवा (कुष्ठ व क्षयरोग), पुणे कार्यालय यांचे पत्र क्र. ससंआसे /कुष्ठ व क्षय /औ.भां./प्रशा.मंजूरी/Truenat machine/३८९५-९८/२१, दिनांक १०.०२.२०२२.
२) सहसंचालक, आरोग्य सेवा (कुष्ठ व क्षयरोग), पुणे कार्यालय यांचे पत्र क्र. ससंआसे /कुष्ठ व क्षय /औ.भां./प्रशा.मंजूरी/Truenat machine/५५४०-४३/२१, दिनांक १६.०२.२०२२.
३) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांच्याकडील दिनांक ०२.०२.२०२२ रोजीची मान्य टिप्पणी.
४) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र.भाखंस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६.

**प्रस्तावना:-**

सहसंचालक, आरोग्य सेवा (कुष्ठ व क्षयरोग), पुणे यांनी संदर्भ क्र.२ अन्वये प्रस्तावित केल्यानुसार राष्ट्रीय आरोग्य अभियान/ राष्ट्रीय क्षयरोग दुरीकरण कार्यक्रम मंजूर प्रकल्प अंमलबजावणी आराखडा (PIP) सन २०२१-२२ मधील FMR Code १.१.१८.१ अर्थशिर्षांतर्गत तरतुदीमधून एकूण १५० नग Truenat Machine ही उपकरणे व यंत्रसामुग्री संदर्भ क्र.४ मधील नियमावलीनुसार एकलस्त्रोताद्वारे खरेदी करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सहसंचालक, आरोग्य सेवा (कुष्ठ व क्षयरोग), पुणे यांनी दिनांक १०.०२.२०२२ रोजीच्या पत्रान्वये प्रस्तावित केल्यानुसार आणि त्यास आयुक्त, आरोग्य सेवा यांनी दिनांक ०२.०२.२०२२ च्या टिप्पणीन्वये मान्यता दिल्यानुसार राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत सन २०२१-२२ या वर्षात राष्ट्रीय क्षयरोग दुरीकरण कार्यक्रमांतर्गत Procurement of Equipment (FMR Code ६.१.१.१८.१) या

अर्थशिर्षांतर्गत मंजूर पी.आय.पी. अनुदानातून एकूण १५० नग Truenat machines M/s Malbio Diagnostics Pvt.Ltd. यांच्याकडून एकलस्त्रोत पध्दतीने खरेदी करण्यासाठी प्रती नग रु.८.९६ लक्ष (सर्व करासहीत) करीता येणारा एकूण रु.१३.४४ कोटी इतक्या रकमेस खालील तपशिलात नमूद केल्यानुसार व पुढील अटींच्या अधीन राहून प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| **Joint Director of Health Services (Leprosy and TB) Pune 06.** | | | | |
|---|---|---|---|---|
| **Procurement of Equipment (FMR Code- 6.1.1.18.1) for 2021-22** | | | | |
| **Total available Budget Rs.1913.00 Lakh** | | | | |
| **Proposal Amount Rs.1344.00 Lakh** | | | | |
| **Sr. No.** | **Item Description & Qty.** | **Approx. Total rate per unit including all taxes (12%) & all charges Rs.** | **Total No. of quantity to be purchased** | **Total Amount (Rs) (Including All Taxes)** |
| 1 | Truelab Real time Micro PCR RTPCR workstation comprising of -1 | 8,96,000/- | 150 | 13,44,00,000/- |
| 2 | Truelab DUO Real time Micro PCR Analyzer-1 | | | |
| 3 | Trueprep Auto Sample Preparation device- 1 | | | |
| 4 | Truelab Micro PCR Bluetooth printer-1 | | | |
| 5 | SMPS- 1 | | | |
| 6 | Truepet 6ul- 1 | | | |
| | **Total Rs.** | | | **13,44,00,000/-** |

अटी :-

१) सदर साहित्य सामुग्रीच्या खरेदीची आवश्यकता / मागणी याची शहानिशा / खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच सदर बाबींच्या खरेदीसाठी प्रक्रिया राबविण्यात यावी.

२) सदरहू साहित्य सामुग्रीची खरेदी विनिर्देश गरजेनुसार व अद्ययावत असल्याची खातरजमा करण्यात यावी. खरेदी करावयाच्या बाबींचे तांत्रिक विनिर्देश (Technical specification) संबंधित तज्ञांनी (तांत्रिक समिती / अधिकारी) यांनी मान्य केलेल्या विनिर्देशानुसार असावेत. तसेच, सदर तांत्रिक विनिर्देश (Technical specification) हे कोणत्याही विशिष्ट कंपनीला फायदा होईल अशा रितीने तयार केलेले नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी. पीआयपी मध्ये मंजूर असलेल्या बाबींच्या तांत्रिक विर्निदेशानुसार मागणीपत्र पाठविण्याची जबाबदारी संबंधीत कार्यक्रम प्रमुखांची राहिल. प्रस्तावातील समाविष्ट असलेल्या बाबींचीच खरेदी करण्यात यावी.

३) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दिनांक १ डिसेंबर, २०१६ अन्वये प्रसिध्द करण्यात आलेल्या शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची सुधारीत नियमपुस्तिका यामधील

तरतूदीनुसार विहित खरेदी प्रक्रिया राबविण्यात यावी. त्यामध्ये प्रामुख्याने नियम क्र.३.२.६ मध्ये एकलस्त्रोत खरेदी या अंतर्गत नमूद केलेल्या बाबींची दक्षता घ्यावी.

४) प्रशासकीय मान्यता देताना प्रस्तावित खरेदीचे दर हे अंदाजित आहेत. त्यामुळे खरेदी प्रक्रियेअंती दर निश्चित करण्यात यावा. सदर दर हा बाजार भावापेक्षा कमी असल्याबाबत आणि संबंधित पुरवठादाराने या बाबीचा इतर ठिकाणी ज्या दराने पुरवठा केला आहे, त्या दरापेक्षा जास्त नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी.

५) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींची पुरवठापूर्व / पुरवठानंतर नमुना तपासणी (pre/Post dispatch random sample inspection) करुन उचित व योग्य विनिर्देश (specification) असलेल्या वस्तुंचीच खरेदी करण्यात येईल, याची खात्री करण्यात यावी.

६) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींचा पुरवठा झाल्यानंतर त्यांची साठवणूक व वितरण (storage & distribution) करणे तसेच, पुरवठा साखळी व्यवस्थापन (Supply chain management) आणि वस्तुसूची व्यवस्थापन (Inventory Management) योग्य पध्दतीने करुन सदर बाबी विनावापर पडून राहणार नाहीत व त्यांचा विहीत मुदतीत वापर होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

७) सदरचा खर्च राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत सन २०२१-२२ च्या मंजूर पी.आय.पी.नुसार अर्थशिर्ष FMR Code ६.१.१.१८.१ या घटकामधील उपलब्ध अनुदान रु.१९१३.०० लक्ष इतक्या अनुदानातून भागविण्यात यावा. सदरची खरेदी प्रशासकीय मंजुरीच्या विहित कालावधीत पूर्ण होईल याची दक्षता घ्यावी. तसेच, या बाबींच्या खरेदी द्विरुक्ती (Duplication) होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

८) संपूर्ण खरेदी प्रक्रिया राबविताना केंद्रिय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचनांचे (CVC Guidelines) तंतोतंत पालन करण्यात यावे.

९) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/भाग-२/२०१३/विनियम, दिनांक १७ एप्रिल, २०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला उपविभाग-दोन मधील अ.क्र.४ नियम क्र.७ समोरील स्तंभ क्र.६ येथील अटींची पूर्तता करण्यात यावी.

१०) खरेदी प्रक्रिया पूर्ण झाल्यानंतर खरेदी समितीच्या मान्यतेनंतरच पुरवठा आदेश निर्गमित करण्यात यावेत. सदर प्रकरणी सार्वजनिक आरोग्य विभाग शासन निर्णय क्र.खरेदी - २०१६/प्र.क.२४०/आरोग्य-८ दिनांक २६ जुलै,२०१७ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार कार्यवाही करण्यात यावी.

०४. उपरोक्त अनुक्रमांक १ ते १० येथे नमूद अटींची पूर्तता करण्याची व खरेदी नियमानुसार व आवश्यकते प्रमाणे आहे हे सुनिश्चित करण्याची संपूर्ण जबाबदारी आयुक्त, आरोग्य सेवा व अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, संचालक, आरोग्य सेवा संचालनालय व कार्यक्रम प्रमुख यांची राहील.

०५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०१२०१५५२३४५२१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO

Digitally signed by LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=047af7706d4845170e3864b62c8bc6b380c78f11ce6607746c0b15e934fc8284, pseudonym=91CF303CCF98AAFBC28FD87C6A71DA717A6A7250, serialNumber=8902AEDC74F3CACF3FB967FF5955AAF5DCBFDD2C053872C04B5E4671EF77EC30, cn=LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO
Date: 2022.02.23 11:47:26 +05'30'

(वि. ल. लहाने)
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत:-

१) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
२) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य संचालनालय, मुंबई.
३) अतिरिक्त संचालक (आरोग्य सेवा), राज्य कुटुंब कल्याण कार्यालय, पुणे.
४) सहसंचालक, आरोग्य सेवा (कुष्ठ व क्षयरोग), पुणे
५) सर्व सह संचालक (आरोग्य सेवा संचालनालया मार्फत)
६) सर्व सहसचिव/उपसचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग.
७) उप संचालक, सर्व मंडळ कार्यालये.
८) सर्व जिल्हा शल्य चिकित्सक.
९) सर्व जिल्हा आरोग्य अधिकारी.
१०) निवडनस्ती (आरोग्य-७).